हंगाम २०१७-१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत नाफेडच्या वतीने महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघामार्फत तूर व हरभरा खरेदीसाठी NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या परंतु त्यांच्या मालाची खरेदी होऊ शकली नाही अशा शेतकऱ्यांना रु.१०००/- प्रती क्विंटल अनुदान देण्यासाठी पणन महासंघामार्फत उभारावयाच्या रु.४८० कोटीच्या कर्जास देण्यात आलेल्या शासन हमीस मुदतवाढ देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
**शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०१८/ सपववि /प्र.क्र. ४६/अर्थबळ,**
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- १९ जानेवारी, २०१९

<u>वाचा</u> -१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी,दि.२८.४.२००८
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी २०१८/सपववि/प्र.क्र.४६/अर्थबळ, दि.१५.६.२०१८

**प्रस्तावना:-**

हंगाम २०१७-१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेअंतर्गत तूर व हरभरा खरेदीसाठी NeML पोर्टलवर नोंदणी केलेले शेतकरी परंतु त्यांच्याकडून तूर अथवा हरभऱ्याची खरेदी होऊ शकली नाही, अशा शेतकऱ्यांना रु.१०००/- प्रति क्विंटल अनुदान वितरीत करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई (ऋणको) यांना रु.४८० कोटी (रुपये चारशे ऐंशी कोटी) इतके कर्ज, निविदा प्रक्रियेनुसार कमीत कमी व्याजदर असलेल्या राष्ट्रीयकृत बँकेकडून (धनको) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या मान्यतेने उभारण्यासाठी उपरोक्त संदर्भाधिन **अ.क्र.३, दि.१५.६.२०१८** च्या शासन निर्णयान्वये शासन हमी मंजूर करण्यात आली होती. सदर शासन हमीची मुदत शासन निर्णयाच्या दिनांकापासून ६ महिन्यांच्या कालावधीपर्यंत वैध होती. सदर मुदत दिनांक १५.१२.२०१८ रोजी संपल्याने महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, मुंबई यांनी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत सादर केलेल्या प्रस्तावानुसार शासन हमीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तुत प्रकरणी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, मुंबई यांनी सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत सादर केलेल्या प्रस्तावानुसार शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शाहमी-२०१८/ सपववि/ प्र.क्र.४६/अर्थबळ, दि. १५.६.२०१८ अन्वये रु.४८० कोटीच्या कर्जास दिलेल्या शासन हमीची मुदत दिनांक १५.६.२०१९ पर्यंत वाढविण्यात येत आहे. शासन निर्णय दिनांक १५.६.२०१८ मधील इतर अटी व शर्ती कायम राहतील.

२. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नस्ती क्र.सपस-२०१८/प्र.क्र.१६६/२४स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र. १/२०१८-१९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९१४३४४६८३०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Walter Cajetan Dmello

Digitally signed by Walter Cajetan Dmello
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15523aa80438dadfcf951b188414eb757c358470bc55b163469bb9cb85bbe50f, serialNumber=20c05674761ef3e1c5207a659b4f2d7699be3df29369f399531d1fa92b517391, cn=Walter Cajetan Dmello
Date: 2019.01.21 12:38:22 +05'30'

**( वॉल्टर डिमेलो )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव.
२) मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा/विधान परिषद, विधानभवन,मुंबई
४) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
५) प्रबंधक, लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) प्रबंधक, उप लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
८) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय,मुंबई (५ प्रती)
११) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
१२) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई
१३) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक्स क्र १, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई- ४०००२०,
१४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई- ४०० ००४.
१५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३,
१६) इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- ४०००२५.
१७) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई- २१,
१८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८,
१९) अ.मु.स. ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, कनमूर हाऊस, नरसी नाथा स्ट्रीट पो.बॉ. नं. ५०८०, मस्जीद बंदर, मुंबई ४००००९
२१) वित्त विभाग (साउ /व्यय-२ /ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासन अधिकारी-२४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.
२३) निवड नस्ती -अर्थबळ.

-------------